**गृह विभागाच्या अधिपत्याखालील महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवर सहायक संचालक (संगणक गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-अ (राजपत्रित) या पदावर सरळसेवेने नियुक्ती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन आदेश क्र.एफएसएल-०४२३/प्र.क्र.१७१/पोल-४**

दुसरा मजला, मुख्य इमारत,

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक: १६ मार्च, २०२४

**संदर्भ** :- **१**. उपसचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.:एचएमआर ११२३/प्र.क्र.७९/ २०२३/अठ्ठावीस, दि. २८.०३.२०२३

२. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. न्या.वै.प्र.सं./प्रशा/प्र.क्र.१०४/ मुं./गो./२७८-२७९/२०२३, दि. १३.०७.२०२३

**प्रस्तावना** :-

महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक संचालक (संगणक गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-अ (राजपत्रित) [६ व्या वेतन आयोगानुसार वेतन बँड रु. १५६००-३९१०१, ग्रेड वेतन ६६००/-] व [सुधारित मॅट्रीक्समधील ७ व्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर S-२३: ६७७००-२,०८,७००/-] या वेतनश्रेणीतील पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील दि.२८.०३.२०२३ च्या पत्रान्वये एकूण ०५ उमेदवारांची त्यांच्या गुणवत्ता क्रमांकानुसार नियुक्तीसाठी शासनास शिफारस करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने सदर ०५ पैकी ०३ उमेदवारांना न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयातील सहायक संचालक (संगणक गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-अ (राजपत्रित) या पदावर सदर शासन निर्णयातील नमूद अटी व शर्तीनुसार सरळसेवेने तात्पुरती नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सहायक संचालक (संगणक गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-ब (राजपत्रित) [६ व्या वेतन आयोगानुसार वेतन बँड रु. १५६००-३९१०१, ग्रेड वेतन ६६००/-] व [सुधारित मॅट्रीक्समधील ७ व्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर S-२३: ६७७००-२,०८,७००/-]

या वेतनश्रेणीतील पदावर संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये शिफारस करण्यात आलेल्या ०५ पैकी ०३ उमेदवारांना सदर उमेदवारांच्या नावापुढे दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी खालील नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रयोगशाळानिहाय नियुक्ती देण्यात येत आहे:-

| **अ. क्र.** | **गु. क्र.** | **उमेदवारांचे नाव** | **जात प्रवर्ग** | **आयोगाने नियुक्तीसाठी शिफारस केलेला प्रवर्ग** | **पदस्थापनेच्या न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळेचे ठिकाण** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | १ | श्री.गौरव चंद्रकांत वायाळ | (खुला) | खुला (सर्वसाधारण) | न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, मुंबई |
| २ | ३ | श्री.गोरे रणजित पांडुरंग | आदुघ | आदुघ (सर्वसाधारण) | प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नांदेड |
| ३ | ५ | श्रीम. बिन्नर प्रणिता बबन | भ.ज.-क (महिला) | भ.ज.-क (सर्वसाधारण) | न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, मुंबई |

सदरहू नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे :-

१) सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२८.०५.२०१८ च्या शासन निर्णयातील सूचनेप्रमाणे संबंधित उमेदवारांनी सदर आदेश प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत पदस्थापनेच्या ठिकाणी रुजु होऊन अहवाल संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, विद्यानगरी, हंस भुग्रा मार्ग, कलिना, सांताक्रुझ (पू), मुंबई-४०००९८ यांच्याकडे पाठवावे.

२) सदर शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या नियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी उमेदवारांना प्रवासभत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३) सदरहू उमेदवार हे विहित कालावधीत नियुक्तीच्या ठिकाणी रुजु झाले तर त्यांची सेवाज्येष्ठता ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने निश्चित केलेल्या गुणवत्ता क्रमांकानुसार राहील.

४) सदर उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी हा नियुक्तीच्या पदावर रुजू झाल्याच्या तारखेपासून २ वर्षाचा राहील. सदर कालावधीत परिवीक्षा धोरणानुसार शासकीय कामकाज करण्यास एखादा उमेदवार सक्षम नसल्याचे सिध्द झाल्यास अशा उमेदवाराची शासकीय सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२२.०६.२०२१ मध्ये परिविक्षा धोरणाबाबत नमूद केलेल्या अटी व शर्ती सदर उमेदवारांना लागू राहतील.

६) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९.०३.२००३ अन्वये संगणक हाताळणी /वापराबाबतचे शासन मान्यताप्राप्त मूळ प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून २ वर्षाच्या आत विभाग प्रमुखांकडे सादर करणे आवश्यक आहे.

७) दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीत किंवा त्यानंतर शासनाने विहीत नियमानुसार वाढविलेला परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर त्यांची सहायक संचालक (संगणक गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-अ (राजपत्रित) या संवर्गात नियमित नेमणूक केली जाईल.

८) सदर उमेदवार जर दोन वर्षाच्या कालावधीच्या आत किंवा वाढविलेल्या परिविक्षाधीन कालावधीमध्ये कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त करु शकले नाहीत आणि/किंवा विहीत परीक्षा/चाचण्या उत्तीर्ण झाले नाहीत किंवा गैरवर्तणूकीबद्दल दोषी आढळले किंवा शासकीय सेवेत अभियोग्य नसतील तर अशा उमेदवाराची सेवा समाप्त करण्यात येईल.

९) नियमाप्रमाणे सदर उमेदवारांना विहीत मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण व्हावे लागेल व सदर परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास शासन नियमानुसार योग्य ती कार्यवाही करण्यात येईल.

१०) उपरोक्त वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांना लागू असलेले अन्य सेवाविषयक नियम सदर उमेदवारांना लागू होतील.

११) सदर उमेदवारांची पदस्थापना या शासन निर्णयात दर्शविण्यात आलेल्या ठिकाणीच करण्यात येईल, उमेदवारांची ओळख पटविण्यासाठी छायाचित्र असलेले आधारकार्ड, मोटार ड्रायव्हिंग लायसन्स अथवा अन्य वैध प्रमाणपत्रे यापैकी एकाच्या आधारे रुजू करुन घेण्याबाबतची दक्षता संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी घ्यावी.

**२.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र २०२४०३१६१६०९१४५१२९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SUDHAKAR SHAHAJI YADAV

Digitally signed by SUDHAKAR SHAHAJI YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=3e782c1e59acd749fc48c691d7a8c477d6ac39c1904204f442b52d728d48a67a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A576ADA378C3E1DDFF427C2BC46B5A5C32BC32EF80F7A475ABFA122778AAAD72, cn=SUDHAKAR SHAHAJI YADAV
Date: 2024.03.16 16:39:11 +05'30'

**(सुधाकर यादव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राद्वारे)
३. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय,मुंबई.

४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.

५. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा,पुणे/कोल्हापूर/नाशिक/औरंगाबाद/नांदेड/नागपूर/अमरावती.

७. उपसंचालक, लघु न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा ठाणे/रत्नागिरी/सोलापूर/धुळे/चंद्रपूर.

८. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.

९. अधिदान व लेखा अधिकारी/निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.

१०. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/सोलापूर/औरंगाबाद/नागपूर/अमरावती

११. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१२/कार्या-१६ब),मंत्रालय,मुंबई.

१२. सर्व संबंधित उमेदवार यांना,

(संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय,मुंबई यांचे मार्फत)

१३. निवडनस्ती , गृह विभाग/पोल-४